वस्त्रोद्योग प्रभागासाठी राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे व कर्जावरील व्याज या दोन्ही प्रयोजनासाठी नविन लेखाशिर्षास मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सकीर्ण-२०१९/(प्र.क्र.७०/२०१९)/९-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
तारीख: १९ ऑक्टोबर, २०१९

**प्रस्तावना :-**

सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागातील तीनही प्रभागांकरिता राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळास अदा करावयाचा कर्जाचा व कर्जावरील व्याजाचा वार्षिक हप्ता अनुक्रमे राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे (६००३ ०२४२)-५६ कर्जाची परतफेड व राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज (२०४९ १०४३)-४५ व्याज या एकाच योजनेमधून करण्यात येत होता. राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे व राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज या दोन्ही प्रयोजनासाठी प्रभागनिहाय (सहकार/पणन/वस्त्रोद्योग) स्वतंत्र लेखाशिर्ष असणे विभागाच्या दृष्टीने जास्त सोयीचे होईल. जेणेकरुन प्रत्यक्ष वसूलीसंदर्भात माहितीही त्या त्या प्रभागाने वित्त विभागास सादर करणे, निधी वितरण करणे सोपे होईल आणि स्वतंत्र लेखार्शिर्षांतर्गत प्रभागनिहाय तरतूदी ही त्याच प्रमाणात अर्थसंकल्पीत करण्यात येतील तसेच, प्रभागनिहाय स्वतंत्र लेखाशिर्ष असल्यामुळे अचूक अंदाज सादर होऊन दरवर्षी प्रत्यर्पित होणाऱ्या तरतूदीमध्येही अचुकता येईल. याकरिता सन २०२०-२१ पासून प्रभागनिहाय (पणन व वस्त्रोद्योग) नविन लेखाशिर्ष घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे व कर्जावरील व्याज या दोन्ही प्रयोजनासाठी वस्त्रोद्योग प्रभागास खालीलप्रमाणे नविन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | मराठी | इंग्रजी |
|---|---|---|
| वस्त्रोद्योग | मागणी क्रमांक व्ही-१<br>२०४९, व्याज प्रदाने,<br>०१, देशांतर्गत ऋणावरील व्याज<br>२०० देशांतर्गत इतर ऋणावरील व्याज<br>(०२) कर्जावरील व्याज,<br>भारित (०२)(०८) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडुन मिळणाऱ्या कर्जावरील व्याज (वस्त्रोद्योग) (अनिवार्य) (२०४९ २७२९)<br>४५, व्याज | Demand No.V-१<br>२०४९, Interest Payments<br>०१, Interest on Internal Debt<br>२००-Interest on Other Internal Debts<br>(०२) Interest of Loans<br>Charged (०२)(०८)- Interest On Loans from National Co-operative Development Corporation (Textiles) (Committed) (२०४९ २७२९)<br>४५, Interest |

| | | |
|---|---|---|
| वस्त्रोद्योग | मागणी क्रमांक व्ही-४<br>६००३, राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण,<br>(००)<br>१०८,राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडुन मिळालेली कर्जे<br>(००)(०३) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडुन मिळालेली कर्जे (वस्त्रोद्योग) (अनिवार्य) भारित (६००३ ०४६७)<br>५६, कर्जाची परतफेड | Demand No.V-४<br>६००३, Interest Debt of State Government<br>(००)<br>१०८,Loans form National Co-operative Development Corporation<br>(००)(०३) Loans form National Co-operative development corporation (Textiles) (Committed) (६००३ ०४६७)<br>५६, Loans Repayment |

२. हा शासन निर्णय प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी-१), महाराष्ट्र मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सं: ख.वि./चा-१/स.प.व.वि./युओआर-९३/२०१८-१९/६५७, दि.२७.०९.२०१९ अन्वये आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक सं.क्र.४२६/२०१९/व्यय-२ दि.१५.१०.२०१९ अनुसार त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१९१२३४१४९३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shilpa Dilip Gaikwad
Date: 2019.10.19 12:36:49 +05'30'

**( शि.दि. गायकवाड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२. सह सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. अवर सचिव/कक्ष अधिकारी (टेक्स-१अ/ब, टेक्स-२,) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा) नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मादाम कामा रोड, मंत्रालयासमोर, मुंबई -३२

११. संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ४ सिरी इन्स्टिटयुशनल एरिया, हौजखास नवी दिल्ली ११०००१

१२. प्रादेशिक उपसंचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ५ बी.जे.रोड, पुणे.

१३. निवडनस्ती (९-स)